**देवशयनी आषाढी एकादशी निमित्त देहू ते पंढरपूर व आळंदी ते पंढरपूर या दोन्ही पालखी मार्गावरील चित्ररथ प्रदर्शनाच्या आयोजन खर्चास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.५९४/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०२४

**वाचा :-** १. सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र.सां.का.सं/४३९१, दिनांक २ ऑगस्ट, २०२३.
२. सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र.सां.का.सं/१४४०, दिनांक १३ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

पंढरपूरची वारी हा एक ऐतिहासिक व सांस्कृतिक ठेवा असून यास जवळजवळ ८०० वर्षांचा सांस्कृतिक वारसा लाभाला असून ही वारी जगभरातील मोजक्याच धार्मिक व आध्यात्मिक क्षेत्रातील एक महत्त्वाची घटना आहे. सदर वारीमध्ये राज्य व राज्यबाहेरील वारकरी-भाविक मोठ्या संख्येने कोणत्याही अपेक्षेशिवाय सहभागी होत असतात.

दरवर्षी आषाढी वारी निमित्त देहू आणि आळंदी येथून श्री संत तुकोबा महाराज आणि श्री संत ज्ञानेश्वर महाराज यांच्या नावाने दोन वेगवेगळ्या दिंड्यांचे आयोजन करण्यात येते. सदर दोन प्रमुख दिंड्या दोन मार्गाने दरवर्षी प्रवास करत असून या पालखी मार्गावर दरवर्षी लाखो भाविक-वारकरी वारीबरोबर प्रवास करतात. या दोन्ही पालखी मार्गावरील चित्ररथ प्रदर्शनाकरीता झालेल्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आषाढी वारी निमित्त देहू ते पंढरपूर आणि आळंदी ते पंढरपूर या दोन्ही पालखी मार्गावरील चित्ररथ प्रदर्शनकरीता प्रत्येक पालखी मार्ग चित्ररथ प्रदर्शन रुपये १९.०० लक्ष याप्रमाणे एकूण खर्च रुपये ३८.०० लक्ष (अक्षरी रुपये चाळीस लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे .

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील. उपरोक्त कार्यक्रमासाठी होणाऱ्या तपशिलवार खर्चाची देयके कार्यक्रम संपन्न झाल्यानंतर १५ दिवसांच्या आत अदा करणे आवश्यक राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३२७१५४३३४५६२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA
SURYAKANT
DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.03.27 15:53:18 +05'30'

**( अनिरुद्ध सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४.